**महाराष्ट्र शासन**

ज्ञापन क्रमांकः एमसीए १०१६/( ८७/१६)/अर्थ-२
जलसंपदा विभाग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ९ डिसेंबर, २०१६.

**ज्ञापन:-**

१. मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे
२. अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर
३. अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा
४. अधीक्षक अभियंता, यांत्रिकी पाटबंधारे मंडळ, नागपूर

**विषय:-** शासकीय कर्मचाऱ्यांना मोटार वाहन अग्रिम मंजूर करण्याबाबत.

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षासाठी ७६१०-शासकीय कर्मचाऱ्यांना कर्जे या लेखाशीर्षांतर्गत, २०२-मोटार वाहन अग्रीम (७६१० ०४२५) याखाली रुपये ५००.०० लक्ष इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली आहे. सदर रक्कमेपैकी रुपये **८७.१४ लक्ष** इतकी रक्कम वितरीत करण्यात आली असून शिल्लक रक्कम रुपये **४१२.८६ लक्ष** इतकी आहे.

उपरोक्त नियंत्रक अधिकारी यांना कळविण्यात येते की, वित्त विभागाने शासकीय कर्मचाऱ्यांना अग्रिम मंजूर करण्यास्तव वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय / शासन परिपत्रक यामधील विहित अटींच्या अधीन राहून शासकीय कर्मचाऱ्यांना मोटार वाहन अग्रिम या प्रयोजनार्थ, सदरहू शिल्लक रक्कमेतून खालील दर्शविलेल्या विवरणपत्र **"अ"** व **"ब"** नुसार नवीन / जुनी मोटार कार खरेदीसाठी एकूण **रुपये १७,५०,०००/- (रुपये सतरा लक्ष पन्नास हजार फक्त) चे** अग्रिम मंजूर करण्यास निधी वितरीत करण्यात येत आहे.

**विवरणपत्र - अ**

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | User ID | नियंत्रक अधिकारी | वितरीत अग्रिम |
|---|---|---|---|
| १) | आय ००१६ | मुख्य अभियंता (वि.प्र.), जलसंपदा विभाग, पुणे | ३.५० |
| २) | आय ००१३ | अधीक्षक अभियंता, कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर | ७.०० |
| ३) | आय ००१९ | अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा | ३.५० |
| ४) | आय ००३७ | अधीक्षक अभियंता, यांत्रिकी पाटबंधारे मंडळ, नागपूर | ३.५० |
| | | **एकूण :-** | **१७.५०** |

**विवरणपत्र - ब**

**(रुपये लक्ष)**

| अ. क्र. | कर्मचाऱ्याचे नाव | पदनाम | मंडळ कार्यालयाचे नाव | मंडळ कार्यालयाचा पत्र क्रमांक व दिनांक | वाहन प्रकार | मुळ वेतन (रुपयात) | उपलब्ध केलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | अ.म.कोरगांवकर | सहा.अभियंता श्रेणी -२ | अ.अ., कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर | पशा-१०/२६१८/१६, दि.२२.०४.१६ | नवीन कार | २७४१० | ३.५० |
| २ | द.र.बावडेकर | शाखा अभियंता | अ.अ., कोल्हापूर पाटबंधारे मंडळ, कोल्हापूर | पशा-१०/४६६०/१६, दि.२२.०७.१६ | नवीन कार | २४४४० | ३.५० |
| ३ | ए.दि.दिंडोरे | उप विभागीय अभियंता | मु.अ(वि.प्र).,जलसंपदा विभाग,पुणे | आ-८/४५४१/१६, दि.०९.०८.१६ | नवीन कार | २६४५० | ३.५० |
| ४ | ता.ह.माने | शाखा अभियंता | अ.अ.,सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ,सातारा | आस्था-४/१६७३/१६, दि.१७.०३.१६ | नवीन कार | २६७६० | ३.५० |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५ | दु.ह.बन्सोड | शाखा अभियंता | अ.अ., यांत्रिकी मंडळ, नागपूर | आ-२/३५८०/१६. दि१.१०.१६ | नवीन कार | २१३५० | ३.५० |
| | | | | | | **एकूण सर्व :-** | **१७.५०** |

२. श्री.दिंडोरे,उपविभागीय अभियंता यांना शासन ज्ञापन क्रमांक:एमसीए १०१६(८७/१६)/अर्थ-२ दि.२८ जुलै २०१६ अन्वये मंजूरी देण्यात आलेले मोटार वाहन अग्रिमचे आदेश याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

३. उपरोक्त अग्रिमाची नोंद सेवापुस्तकात घेण्याची दक्षता घ्यावी, तसेच कर्मचाऱ्यांची बदली झाल्यानंतर त्यांचे अंतिम वेतन प्रमाणपत्र देताना त्यामध्ये अग्रिमाच्या हप्त्याच्या अनुषंगाने आवश्यक नोंद घेण्यात यावी. मोटार कार अग्रिम कर्मचाऱ्यास / अधिकाऱ्यास सेवा कालावधीत एकदाच देय राहील.

४. सदर अग्रिम अर्जदाराने त्याच कारणासाठी वापरल्याच्या प्रमाणपत्राची प्रत नियंत्रण अधिकाऱ्यांनी अर्जदाराकडून उपलब्ध करुन घ्यावी. तसेच मुंबई वित्तीय नियमातील फॉर्म नं.२० मधील करारपत्र, फॉर्म नं.२१ मधील गहाणखताच्या प्रती व प्रतिभूती बंधपत्राच्या प्रती संबंधित अधिकारी / कर्मचारी यांच्याकडून प्राप्त करुन घेऊन मंजूरी अधिकारी कार्यालयाच्या अभिलेख्यामध्ये जतन करण्यात याव्यात.

५. अग्रिमासाठी अर्ज करणाऱ्या अधिकाऱ्याची शासनाच्या सेवेतील नियुक्ती संबंधित पदाच्या सेवाभरती नियमानुसार करण्यात आलेली असली पाहिजे आणि अशाप्रकारे करण्यात आलेल्या नियुक्तीनंतर कमीत कमी ५ वर्षाची सलग सेवा झाली असली पाहिजे.

६. दिनांक ०१.०५.२००१ रोजी किंवा त्यानंतर दोनपेक्षा अधिक अपत्ये असणाऱ्या अर्जदारास (दुस-या वेळेस जुळ्या अपत्यांचा अपवाद वगळता) या अग्रिमाचा लाभ घेता येणार नाही. याची सर्वस्वी जबाबदार नियंत्रक अधिकाऱ्यांची राहील.

७. मोटार कार अग्रिमाची व्याजासह पूर्ण परतफेड होईपर्यंत मोटार कार शासनाकडे गहाण राहील. त्यासाठी संबंधित अधिकाऱ्यास विहित नमुन्यात व कार्यपध्दतीप्रमाणे गहाणखत भरुन देणे आवश्यक राहील.

८. यासंबंधी होणारा खर्च मागणी क्रमांक आय-७ खाली '७६१० शासकीय कर्मचारी इत्यादींना कर्जे (२०२) मोटार वाहनांच्या खरेदीसाठी अग्रिमे (योजनेत्तर)' (संगणक संकेतांक क्रमांक ७६१० ०४२५) या शीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्याखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

९. **प्रस्तुत ज्ञापन रवाना झाल्याच्या तारखेपासून <u>एक महिन्याच्या आत</u> अग्रिम मंजूर करुन अग्रिमाची रक्कम अर्जदारास त्वरित अदा केली जाईल याची दक्षता घेण्यात यावी.**

१०. अग्रिमाची रक्कम अदा केल्यावर दोन महिन्याच्या आत महालेखापाल कार्यालयात जाऊन खर्चमेळ जुळविल्याचे महालेखापाल कार्यालयातील कक्ष अधिकाऱ्यांच्या स्वाक्षरीचे प्रमाणपत्र विहित विवरणपत्रात शासनास सादर करावे.

११. जर अर्जदार आपल्या कार्यालात कार्यरत नसतील तर सदर अर्जदाराचा निधी शासनास समर्पित करावा व तसे कळवावे.

१२. सदरहू ज्ञापन हे वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थसंकल्प-३, दि.२०.०४.२०१६ सोबतच्या परिशिष्टातील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१६१२०९१५४९२२१५२७ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudhakar S Yadav

Digitally signed by Sudhakar S Yadav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sudhakar S Yadav
Date: 2016.12.09 15:51:26 +05'30'

**( सु. श. यादव )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. वित्त विभाग (अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल (लेखा परीक्षा) १ / २ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
४. लेखा कार्यासन, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. अर्थ-२ कार्यासन संग्रहार्थ.